दादा भगवान प्ररूपित

# एडजस्ट एवरीव्हेर

सगळ्यांबरोबर एडजस्ट होणे, हाच सर्वात मोठा धर्म आहे.

Marathi

दादा भगवान प्ररूपित

# एडजस्ट एवरीव्हेर

मूळ गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

अनुवाद : महात्मागण

**प्रकाशक** : अजीत सी. पटेल
दादा भगवान विज्ञान फाउंडेशन
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर,
नवरंगपुरा, अहमदाबाद - 380009,
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2100



**प्रथम आवृत्ति** : 1000 सप्टेंबर, 2007
**रीप्रिंट** : 12000 फेब्रुवारी 2009 ते ऑगस्ट 2015
**नयी रीप्रिंट** : 5000 जुलै 2017

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 10 रुपये

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
B-99, इलेक्ट्रॉनिक्स GIDC,
क-6 रोड, सेक्टर-25,
गांधीनगर-382044.
Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2142

**ISBN/eISBN** : 978-93-86289-79-7

Printed in India

## त्रिमंत्र





नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो ऊवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद





# दादा भगवान कोण?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भुत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवत आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली. अशाप्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातच्या चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षूंना सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भुत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोक'चे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. या सिद्धांताने त्यांनी आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले. संपूर्ण जीवनात त्यांनी कधीही, कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवित असत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञानासंबंधित जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषयांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये असे विशेष ध्यान ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रुटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानर्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण दिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.



# संपादकीय

जीवनात येणाऱ्या प्रत्येक प्रसंगात आपण स्वत:च समजून समोरच्या व्यक्तीशी एडजस्ट झालो नाही, तर भयंकर संघर्ष होतच राहतील. जीवन विषमय होईल. आणि शेवटी तर जग जोरजबरदस्तीने सुद्धा आपल्याकडून एडजस्टमेंट करवूनच घेईल! आपण जिकडे-तिकडे, स्वखुशीने किंवा नाखुशीने स्वत:हून एडजस्ट होतच आहोत, तर मग आपण स्वत:च समजून एडजस्ट का होऊ नये की जेणे करून कित्येक संघर्ष टाळता येतील आणि सुखशांतीही नांदेल.

लाईफ इज नथिंग बट एडजस्टमेंट (आयुष्य म्हणजे एडजस्टमेंटशिवाय दुसरे काहीच नाही.) जन्म झाल्यापासून मरेपर्यंत एडजस्टमेंट करावीच लागते. मग ती रडून करा किंवा आनंदाने करा. शिक्षण आवडो किंवा न आवडो, तरी एडजस्ट होऊन शिकावेच लागते! लग्न करताना कदाचित आपण आनंदाने लग्न करतो, परंतु लग्नानंतर संपूर्ण आयुष्य पति-पत्नी ह्या दोघांना एडजस्टमेंटस् कराव्याच लागतात. दोन भिन्न प्रकृतीच्या माणसांनी संपूर्ण आयुष्य एकत्र राहायचे तर जुळवून घ्यावेच लागते. ह्यात आयुष्यभर एकमेकांना पूर्णपणे एडजस्ट होईल असा भाग्यवान कोण असणार ह्या काळात?! अरे, प्रत्यक्ष श्रीराम आणि सीतामाता, ह्यांची पण खूप वेळा डिसएडजस्टमेंट झाली नव्हती का? सोनेरी हरण, अग्निपरीक्षा आणि गर्भवती असताना देखील जंगलात झालेली सीतामाईंची हकालपट्टी! त्यांनी कशा प्रकारे एडजस्टमेंट केली असेल?

आई-वडील आणि मुले यांना पावलोपावली एडजस्टमेंट्स कराव्या नाही का लागत? जर समजून एडजस्टमेंट्स केल्या तर शांती राहील आणि कर्मे पण बांधली जाणार नाहीत. कुटुंबात, मित्रांसोबत, धंद्यात, बॉस सोबत, व्यापारी किंवा दलालासोबत, तेजी-मंदीच्या काळात, सर्वच ठिकाणी जर आपण एडजस्टमेंट केली नाही, तर दु:खाचे डोंगर उभे राहतील.

म्हणून 'एडजस्ट एवरीव्हेर'ची 'मास्टर की' (गुरुकिल्ली) घेऊन जो मनुष्य जीवन व्यतीत करेल, त्याच्या जीवनातील कोणतेही कुलूप उघडणार नाही, असे होणार नाही. ज्ञानी पुरुष पूज्य दादाश्रींचे सोनेरी सूत्र 'एडजस्ट एवरीव्हेर' जीवनात अंगिकारले तर संसार सुखमय होईल!

**-डॉ. नीरूबहन अमीन**

# एडजस्ट एवरीव्हेर

## पचवा एकच शब्द

**प्रश्नकर्ता :** आता तरी जीवनात शांतीचा सरळ मार्ग हवा आहे.

**दादाश्री :** एकच शब्द जीवनात उतरवाल? तंतोतंत, एक्जॅक्ट?

**प्रश्नकर्ता :** हो, एक्जॅक्ट.

**दादाश्री :** 'एडजस्ट एवरीव्हेर.' एवढा एकच शब्द जर तुम्ही जीवनात अंगिकाराल तरी खूप झाले. तुम्हाला शांती आपोआप मिळेल. सुरुवातीच्या सहा महिन्यांपर्यंत अडचणी येतील, नंतर मग आपोआपच शांती राहील. पहिले सहा महिने मागील रिॲक्शनस् (प्रतिक्रिया) येतील, सुरुवात उशीरा केली त्यामुळे. तेव्हा 'एडजस्ट एवरीव्हेर.' कलियुगातील अशा भयंकर काळात तुम्ही जर एडजस्ट झाला नाहीत तर संपूनच जाल!

संसारात दुसरे काही करता आले नाही तरी हरकत नाही, पण 'एडजस्ट' होता आलेच पाहिजे. समोरची व्यक्ती 'डिसएडजस्ट' होत असेल, परंतु तुम्ही एडजस्ट होत राहिलात तर संसारसागर तरुन जाल. ज्याला दुसऱ्यांशी अनुकूल होता आले, त्याच्या जीवनात कधीही दु:ख येतच नाही. 'एडजस्ट एवरीव्हेर! प्रत्येकाशी एडजस्ट होणे हाच सर्वात मोठा धर्म आहे. या काळात तर वेगवेगळ्या प्रकारच्या प्रकृती असतात, तेव्हा एडजस्ट झाल्याशिवाय कसे चालणार?

## ढवळाढवळ नाही, एडजस्ट व्हा

संसाराचा अर्थच समसरण मार्ग, म्हणजे निरंतर परिवर्तन होत

राहणे. अशा वेळी ही म्हातारी माणसे जुन्या विचारांनाच चिकटून राहतात. अरे, बदलत्या जगाप्रमाणे वाग, नाही तर मार खाऊन मरून जाशील! काळानुसार एडजस्टमेंट करायलाच हवी. मला तर चोरासोबत, खिसे कापणाऱ्यासोबत, सर्वांसोबत एडजस्टमेंट करता येते. चोरासोबत मी जेव्हा बोलतो, तेव्हा त्यालाही असे वाटते की हे किती करुणावंत आहेत. आम्ही चोराला 'तू खोटा आहेस' असे म्हणत नाही. कारण की तो त्याचा 'व्ह्यू पॉइंट' (दृष्टीकोन) आहे. इतर लोक तर त्याला 'नालायक' म्हणतात, शिव्या देतात. मग हे वकील काय खोटे नाहीत का? 'अगदी खोटी केस पण मी जिंकून देईन' असे म्हणतात, मग ते धूर्त नाहीत का? चोराला धूर्त म्हणायचे आणि हा जो अगदी खोट्या केसलाही खरे म्हणतो, त्याच्यावर विश्वास कसा ठेवायचा? पण तरी त्याचेही काम चालतेच ना? कोणालाही आम्ही खोटे म्हणत नाही. तो त्याच्या व्ह्यू पॉइंटने खराच असतो. पण आपण त्याला खरी गोष्ट समजावायची की, तू चोरी करीत आहेस, त्याचे फळ तुला काय मिळेल?

ही म्हातारी माणसं घरात शिरल्याबरोबर म्हणतील, हे लोखंडाचे कपाट? हा रेडियो? हे असे का? तसे का? अशी ढवळाढवळ (दखल) करतात, अहो! तरुणांसोबत मैत्री करा. हे युग तर सतत बदलतच राहणार. त्याशिवाय हे तरुण जगणार कसे? काही नवीन पाहिले की त्यांना मोह होतो, नवे काही नसले तर हे जगणार कसे? असे नवे तर अनंत वेळा आले आणि गेले, त्यात तुम्ही ढवळाढवळ करू नका. तुम्हाला जमत नसेल तर तुम्ही ते करू नका. हे आईस्क्रीम असे म्हणत नाही की तुम्ही आमच्यापासून दूर व्हा. तुम्हाला खायचे नसेल तर नका खाऊ. पण ही म्हातारी माणसे त्यावर चिडतात. हे मतभेद तर जग बदलल्यामुळे झाले आहेत. ही मुले तर काळानुसार वागतात. मोह म्हणजे नवनवीन उत्पन्न होते आणि नवे-नवेच दिसत राहते. आम्ही लहानपणापासून बुद्धीने खूपच विचार केला होता की हे जग उलट होत राहिले आहे की सुलट होत राहिले आहे, आणि हेही समजून घेतले होते की, ह्या जगाला बदलण्याची

कोणाचीही सत्ता नाही. तरीसुद्धा आम्ही काय सांगतो की तुम्ही जगाप्रमाणे एडजस्ट व्हा. मुलगा नवीन टोपी घालून आला तर असे म्हणू नका की, ही असली टोपी कुठून घेऊन आलास? त्यापेक्षा त्याच्याशी एडजस्ट होऊन त्याला विचारा 'अशी छान टोपी कुठून बरं आणलीस? केवढ्याला मिळाली? खूप स्वस्त मिळाली! असे एडजस्ट होऊन जावे.

आपला धर्म काय म्हणतो की अडचणीत सुद्धा सोय पहा. रात्री मला विचार आला की, 'ही चादर तर मळली आहे,' पण मग एडजस्टमेंट केली, नंतर ती इतकी मऊ वाटू लागली की विचारू नका. पंचेन्द्रियांचे ज्ञान गैरसोयी दाखविते आणि आत्मा सोय दाखवितो. म्हणून आत्म्यात राहा.

## दुर्गंधासोबतही एडजस्टमेंट

ह्या बांद्रयाच्या खाडीत खूप दुर्गंध सुटलेला असतो, मग काय आपण तिच्यावर रागवायचे? त्याचप्रमाणे ही माणसेही दुर्गंध पसरवतात तर आपण त्यांना काही बोलू शकतो का? दुर्गंध पसरवतात त्यास 'खाडी' म्हणतात आणि जिथून सुगंध पसरतो, त्यास 'बाग' म्हणतात. जे-जे दुर्गंध पसरवतात ते सर्व म्हणतात की 'तुम्ही आमच्याशी वीतराग राहा!

हे तर चांगले किंवा वाईट म्हटल्यामुळे ते आपल्याला भूता सारखे त्रास देतात. आपण तर दोन्ही गोष्टी समान करून टाकाव्या. एकास 'चांगले' म्हटले तर दुसरे 'वाईट' झाले, मग ते दुसरे आपल्याला त्रास देत राहते. परंतु दोन्हींचे मिश्रण करून टाकले तर मग त्याचा त्रास होणार नाही. आम्ही 'एडजस्ट एवरीव्हेर' शोधून काढले आहे. कोणी खरे सांगत असेल त्याच्याबरोबर आणि कोणी खोटे सांगत असेल त्याच्याही बरोबर एडजस्ट व्हा. आम्हाला कोणी म्हटले की, 'तुम्हाला अक्कल नाही,' तर आम्ही लगेचच त्याच्याशी एडजस्ट होऊन जातो आणि त्याला म्हणतो, 'ती तर पहिल्यापासूनच नव्हती! तू आता का बरे शोधायला आलास? तुला तर हे आज समजले, परंतु मला हे लहानपणापासूनच माहित आहे,' असे म्हटल्याने सगळा वाद संपुष्टात

येईल. मग पुन्हा तो आपल्याजवळ अक्कल शोधायला येणारच नाही. असे नाही केले तर आपण 'आपल्या घरी' (मोक्षाला) कधी पोहोचणार?

## पत्नीसोबत एडजस्टमेंट

**प्रश्नकर्ता :** एडजस्ट कसे व्हायचे, ते जरा समजवाल का?

**दादाश्री :** आपल्याला काही कारणामुळे उशीर झाला आणि बायको आपल्याला उलट-सुलट बोलायला लागली, की 'एवढ्या उशीरा का येता? मला हे असे चालणार नाही,' वगैरे. तिचे डोके फिरले तर आपण असे म्हणायला हवे की, 'हो, तुझे म्हणणे बरोबर आहे. तू जर म्हणत असशील तर मी परत जातो, नाही तर आत येऊन बसतो.' तेव्हा ती म्हणेल, 'नाही, परत नका जाऊ, मुकाट्याने येथे झोपून जा!' पण मग आपण विचारायचे की, 'तू म्हणशील तर जेवतो, नाही तर झोपून जातो.' तेव्हा ती म्हणेल, 'नाही, आधी जेवून घ्या.' तेव्हा मग आपण तिचे ऐकून जेवून घ्यावे. म्हणजे आपण एडजस्ट झालो. मग ती सकाळी मस्त पैकी चहा देईल. पण जर आपण तिला रागावलो, तर मात्र ती चहाचा कप आपल्या समोर आपटून ठेवेल, आणि हे सर्व तीन दिवसांपर्यंत चालतच राहील.

## खिचडी खाणार की हॉटेलचा पिझ्झा?

एडजस्ट होणे जमले नाही तर लोक काय करतात? बायकोशी भांडतात का ?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** असे होय? कशाची वाटणी करण्यासाठी? बायकोबरोबर कसली वाटणी करायची? मिळकत तर दोघांची समाईक असते.

**प्रश्नकर्ता :** नवऱ्याला गुलाबजाम खायचे असतात आणि बायको खिचडी बनवते, त्यामुळे भांडण होते.

**दादाश्री :** मग भांडण केल्यानंतर काय ती गुलाबजाम बनवणार? नाही. मग तर खिचडीच खायला लागते!

**प्रश्नकर्ता :** मग हॉटेलमधून पिझ्झा मागवतो.

**दादाश्री :** असे होय! म्हणजे हे पण राहिले आणि ते पण राहिले. आणि पिझ्झा येतो, नाही का! आपले ते गुलाबजाम तर येतच नाहीत ना! त्यापेक्षा आपण जर बायकोला सांगितले की, 'तुला जे जमेल ते बनव.' तिला पण कधीतरी (तुमच्या आवडीचे) बनवायची इच्छा तर होईलच ना! ती देखील जेवणार आहे ना? तर आपण म्हणायचे, 'तुझ्या आवडीचे काही तरी बनव ना.' तेव्हा ती म्हणेल 'नाही, तुमच्या आवडीचेच बनवूया.' मग अशावेळी सांगायचे, 'गुलाबजाम बनव.' आणि जर तुम्ही आधीच गुलाबजाम बनवायला सांगितले तर ती म्हणेल, 'नाही, मी खिचडीच बनवीन.'

**प्रश्नकर्ता :** असे मतभेद बंद करण्यासाठी आपण कोणता मार्ग दाखविता?

**दादाश्री :** मी तर हाच मार्ग दाखवितो, 'एडजस्ट एवरीव्हेर'. ती म्हणाली की 'खिचडी करायची आहे' तर आपण 'एडजस्ट' होऊन जायचे. आणि जेव्हा तुम्ही म्हणाल की आता आपल्याला बाहेर जायचे आहे, सत्संगाला जायचे आहे, तर तेव्हा तिने पण 'एडजस्ट' व्हायला पाहिजे. जो आधी बोलेल त्याच्याशी आपण एडजस्ट होऊन जायचे.

**प्रश्नकर्ता :** मग तर आधी बोलण्यासाठी स्पर्धा होईल.

**दादाश्री :** हो, तर तसे कर. तसे कर, पण तिला एडजस्ट होऊन जा. कारण तुझ्या हातात सत्ता नाही. ती सत्ता कोणाच्या हातात आहे ते मला माहित आहे. तर मग 'एडजस्ट' होण्यात तुला काही हरकत नाही ना, भाऊ?

**प्रश्नकर्ता :** नाही, अजिबात नाही.

**दादाश्री :** ताई, तुम्हाला काही हरकत आहे?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग त्याचा निकालच करून टाका ना! 'एडजस्ट एवरीव्हेर' यात काही हरकत आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही, बिलकूल नाही.

**दादाश्री :** तो जर आधी म्हणाला, की आज कांद्याची भजी, लाडू, पुरी, भाजी असे सर्व बनव, तेव्हा आपण एडजस्ट व्हायला हवे आणि जर तुम्ही म्हणालात, आज लवकर झोपायचे आहे, तर त्याने एडजस्ट व्हायचे. तुम्हाला एखाद्या मित्राकडे जायचे असेल तर तेथे न जाता लवकर झोपावे. कारण मित्रासोबत भांडण झाले तर ते पाहता येईल, परंतु येथे घरात मात्र भांडण होऊ देऊ नये. हा तर मित्राशी संबंध टिकवण्यासाठी घरात कटकट करतो, असे व्हायला नको. म्हणून जर ती प्रथम बोलली असेल, तर आपण एडजस्ट होऊन जायला हवे.

**प्रश्नकर्ता :** पण समजा त्याला आठ वाजता मीटिंगला जायचे असेल आणि पत्नी म्हणाली, 'आता झोपून जा.' तर मग त्याने काय करावे?

**दादाश्री :** उगाच अशी कल्पना करू नये. निसर्गाचा नियम आहे की 'व्हेर देयर इज ए विल देयर इज ए वे.' (जिथे इच्छा तिथे मार्ग) कल्पना कराल तर बिघडेल. त्या दिवशी मग तीच म्हणेल, 'तुम्ही लवकर निघा, लवकर निघा,' ती स्वतः तुम्हाला गॅरेजपर्यंत सोडायला येईल. कल्पना केल्याने सर्व बिघडते. म्हणून एका पुस्तकात मी लिहिले आहे 'व्हेर देयर इज विल, देयर इज वे' एवढे पालन केले तरी खूप झाले. पालन कराल ना?

**प्रश्नकर्ता :** हो. नक्की.

**दादाश्री :** चल मला वचन दे बरे! अरे वा, शाबास! ह्यालाच म्हणतात शूरवीर! वचन दिले!

## जेवण्यात एडजस्टमेंट

व्यवहार निभावला म्हणजेच तुम्ही 'एडजस्ट एवरीव्हेर' झाला, असे म्हणता येईल! आता डेव्हलपमेंट जमाना आला. मतभेद व्हायला नको! म्हणून आता मी लोकांना सूत्र दिले आहे, 'एडजस्ट एवरीव्हेर' एडजस्ट, एडजस्ट, एडजस्ट! कढी खारट झाली तर समजून जायचे की दादाजींनी एडजस्टमेंट करण्यास सांगितले आहे. मग थोडीशी कढी खाऊन घ्यावी. जेवताना लोणचे हवे असल्यास सांगावे की लोणचे घेऊन ये, परंतु भांडायचे नाही. घरात भांडण व्हायला नको. आपण कधी अडचणीत असलो आणि आपण स्वतःच तिथे एडजस्टमेंट घेतली, तर संसार शोभून दिसेल.

## आवडत नाही तरीही निभावून घ्या

तुझ्याशी जे कोणी डिसएडजस्ट होत असतील, त्यांच्याशीही तू एडजस्ट होऊन जा. रोजच्या जीवनात जर सासू-सून किंवा जावा-जावा यांच्यात डिसएजस्टमेंट होत असेल, तर ज्याला या संसार चक्रातून सुटायचे असेल, त्याने एडजस्ट व्हायलाच हवे. पति-पत्नी दोघांपैकी जर एक तोडत असेल, तर दुसऱ्याने जोडून घ्यायला हवे. तरच ते संबंध निभावले जातील आणि शांतता राहील. ज्याला एडजस्टमेंट करता येत नाही त्याला लोक मेन्टल (वेडा) म्हणतात. ह्या सापेक्ष सत्यात आग्रह, हट्ट करण्याची गरजच नाही. माणूस म्हणजे कोण, तर जो एवरीव्हेर एडजस्टेबल असेल! चोराशीही एडजस्ट व्हायला हवे.

## सुधारायचे की एडजस्ट व्हायचे?

प्रत्येक गोष्टीत आपण समोरच्याशी एडजस्ट झालो तर किती सोपं होईल. आपण सोबत काय घेऊन जाणार आहोत? कोणी म्हणेल की, 'भाऊ, बायकोला सरळ कर.' अरे, तिला सरळ करायला जाशील तर तू वाकडा होऊन जाशील.' म्हणून बायकोला सरळ करण्याचा प्रयत्न

करू नका. ती जशी आहे तशीच बरोबर आहे. तिच्याबरोबर आपले कायमचे ऋणानुबंध असते तर गोष्ट वेगळी. इथे तर ह्या एका जन्मानंतर दोघेही विखुरले जाल. दोघांचा मरणकाळ वेगळा, दोघांची कर्मे वेगळी! काहीच देण्या-घेण्याचे संबंध नाहीत! येथून मग ती (पुढच्या जन्मी) कोणाकडे जाईल ते आपल्याला माहीत नाही. आपण तिला सरळ करायची आणि पुढील जन्मी ती जाईल कोणा दुसऱ्याच्याच वाट्याला!

म्हणून तुम्हीही तिली सरळ करू नका आणि तिनेही तुम्हाला सरळ करायचे नाही, जसे मिळाले ते सोन्यासारखे! प्रकृती कोणाचीही, कधीही सरळ होत नाही, कुत्र्याचे शेपूट वाकडे ते वाकडेच राहते. म्हणून आपण सावध राहिलेले बरे. ती जशी आहे तशी ठीक आहे, 'एडजस्ट एवरीव्हेर'!

## पत्नी तर आहे 'काउंटर वेट'

**प्रश्नकर्ता :** मी बायकोबरोबर खूप एडजस्ट होण्याचा प्रयत्न करतो पण एडजस्ट होऊ शकत नाही.

**दादाश्री :** हे सगळे हिशोबाप्रमाणे आहे! उलटे आटे आणि उलटा नट, तिथे नट सरळ फिरवला तर कसा मेळ बसेल? तुम्हाला असे वाटते की ही स्त्री जात अशी कशी आहे? पण स्त्री जात तर तुमचे 'काउंटर वेट' (प्रति संतुलन) आहे, जेवढा आपला दोष, तेवढी ती वाकडी, म्हणून तर आम्ही सगळे 'व्यवस्थित' आहे, असे म्हटले आहे ना?

**प्रश्नकर्ता :** सगळेच आम्हाला सरळ करायला आलेत, असे वाटते.

**दादाश्री :** तुम्ही तर सरळ व्हायलाच हवे. सरळ झाल्याशिवाय जग चालणार नाही ना? सरळ झाला नाही, तर बाप कसा होणार? सरळ झाला तरच तो बाप बनू शकेल. स्त्री जात ही अशी आहे की ती बदलणार नाही, म्हणून आपल्यालाच बदलावे लागेल. ती सहज जात आहे. ती बदलेल अशी नाही.

वाईफ (बायको) म्हणजे काय?

**प्रश्नकर्ता :** तुम्हीच सांगा.

**दादाश्री :** वाईफ इज काउंटर वेट ऑफ मॅन (पत्नी पतीची प्रतिसंतुलन आहे). हे काउंटर वेट नसेल तर पुरुष कोलमडून पडेल.

**प्रश्नकर्ता :** हे नाही समजले.

**दादाश्री :** ह्या इंजिनमध्ये काउंटर वेट ठेवण्यात येते. नाही तर इंजिन चालता चालता कोलमडून पडेल. तसेच पुरुषांचे काउंटर वेट स्त्री आहे. स्त्री असेल तर पुरुष पडणार नाही, संतुलित राहील. नाही तर धावपळ करूनही काही पत्ता लागायचा नाही. आज इथे असेल तर उद्या कुठच्या कुठे असेल! स्त्रिया आहेत म्हणून पुरुष घरी परतात. नाही तर येतील का?

**प्रश्नकर्ता :** नाही येणार.

**दादाश्री :** स्त्री त्याचे काउंटर वेट आहे.

## शेवटी संघर्षाचा अंत

**प्रश्नकर्ता :** सकाळचे संघर्ष दुपारी विसरले जातात पण संध्याकाळी परत नवीन संघर्ष निर्माण होतात.

**दादाश्री :** आम्ही जाणतो की, संघर्ष कोणत्या शक्तीने होतात. ती उलट-सुलट बोलते, त्यात कोणती शक्ती काम करते? बोलल्यानंतर पुन्हा 'एडजस्ट' होतात, हे सारे ज्ञानाने समजता येईल असे आहे. पण तरीही संसारात एडजस्ट व्हायचे. कारण प्रत्येक वस्तूचा 'अंत' असतो, आणि समजा काही वेळा तो संघर्ष बराच काळापर्यंत चालला तरीही तुम्ही त्याला 'हेल्प' (मदत) करत नाही, उलट जास्त नुकसान करत असता. तुम्ही स्वत:चे आणि समोरच्या व्यक्तीचेही नुकसान करत आहात.

## नाही तर प्रार्थनेने एडजस्टमेंट

**प्रश्नकर्ता :** समोरच्या व्यक्तीला समजावण्याचा मी बराच प्रयत्न केला, मग तो समजो, अगर न समजो हा त्याचा पुरुषार्थ?

**दादाश्री :** आपली जबाबदारी एवढीच आहे की, आपण त्याला समजावायचे. मग तो समजला नाही तर त्यावर उपाय नाही. मग आपण एवढेच म्हणायचे की 'हे दादा भगवान! याला सद्‌बुद्धी द्या,' एवढे म्हणायचे. त्याला अधांतरी लटकवायचे नसते, ही काही थाप नाही! हे 'दादाजीं'चे 'एडजस्टमेंटचे' विज्ञान आहे, आश्चर्यकारक 'एडजस्टमेंट' आहे हे! आणि जेथे तुम्ही 'एडजस्ट' होत नाही, तेथे मग त्याचा स्वाद पण येतच असेल ना तुम्हाला? 'डिसएडजस्टमेंट' हाच तर मूर्खपणा आहे. कारण त्याला वाटते की मी माझा नवरेपणा सोडणार नाही, माझेच वर्चस्व चालायला हवे! असे मानले तर संपूर्ण आयुष्य उपाशी मरेल आणि एक दिवस ताटात विष येऊन पडेल. सहजपणे चालत आहे त्यास चालू द्या ना! हे तर कलियुग आहे! वातावरणच कसे आहे? म्हणून जर पत्नी म्हणाली, 'तुम्ही नालायक आहात' तर म्हणावे, 'खूप छान.'

## वाकड्याबरोबर एडजस्ट व्हा

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात राहायचे आहे, तर एडजस्टमेंट एक तर्फी व्हायला नकोच ना?

**दादाश्री :** व्यवहार तर त्याला म्हणतात की 'एडजस्ट' होता येत असेल. तर मग शेजारचेही म्हणतील 'सगळ्यांच्या घरी भांडणे असतात पण यांच्या घरी मात्र कधीच भांडण नाही.' असे असेल त्यांचा व्यवहार सर्वोत्तम म्हटला जातो. ज्याच्याबरोबर आपले पटत नाही तेथेच शक्ती विकसित करावी लागते. जिथे पटते तिथे तर शक्ती आहेच. पटत नाही हा तर एक प्रकारचा कमकुवतपणा आहे. माझे सगळ्यांसोबत का जमते? जेवढी एडजस्टमेंट कराल, तेवढी शक्ती वाढेल, आणि कमकुवतपणा

संपून जाईल. सगळ्या विपरीत समजुतींना जेव्हा कुलूप लागेल, तेव्हाच योग्य समज प्राप्त होईल.

सरळ-साध्या माणसांशी तर सर्वच 'एडजस्ट' होतील पण वाकड्या, कठोर, तापट स्वभाव असलेल्या माणसांशी, सर्वांशीच 'एडजस्ट' होता आले, की मग कामच झाले. वाटेल तेवढा निर्लज्ज, नालायक माणूस असेल, तरीसुद्धा त्याच्यासोबतही 'एडजस्ट' होता आले, तिथेही डोके शांत राहिले तर ते कामाचे. डोके फिरून चालणार नाही. घाबरून चालणार नाही. जगातली कोणतीही वस्तू आपल्याला 'फिट' (अनुकूल) होत नसते, तेव्हा आपणच जर त्याला 'फिट' झालो तर हे जग सुंदर आहे. आणि जर त्याला 'फिट' करायला गेलो तर ही दुनिया वाकडी आहे. म्हणून 'एडजस्ट एवरीव्हेर'. आपणच त्याला 'फिट' झालो तर मग प्रश्नच नाही ना!

## डोन्ट सी लॉ, सेटल!

'ज्ञानी पुरुष,' तर समोरचा माणूस वाकडा असेल तरीही त्याच्याशी 'एडजस्ट' होतात. ज्ञानी पुरुषांना पाहून आपणसुद्धा तसे वागलो तर सगळ्या प्रकारच्या एडजस्टमेंट करायला जमेल. या मागचे सायन्स काय म्हणते की 'वीतराग' तुम्ही व्हा, राग-द्वेष करू नका. ही तर आतमध्ये थोडी-फार आसक्ती असते, त्यामुळे मार पडतो. व्यवहारात जे एकपक्षी-निस्पृह होऊन गेले, त्यांना वाकडे म्हणतात. आपल्याला गरज असेल तर समोरचा जरी वाकडा असेल तरी त्याच्याशी समजुतीने व्यवहार करायला हवा. स्टेशनवर हमाल हवा असेल आणि तो (पैशांसाठी) वाद करत असेल तरीही त्याला चार आणे जास्त देऊनसुद्धा त्याचे समाधान करावे. आणि तसे जर केले नाही, तर ती बॅग मग आपल्यालाच उचलावी लागणार ना?

डोन्ट सी लॉ, प्लीज सेटल (कायदा बघू नका, कृपया समाधान करा)' समोरच्या माणसाला 'सेटलमेंट' करायला सांगायचे, की 'तुम्ही

असे करा, तसे करा' असे सर्व सांगण्यासाठी वेळच कुठे आहे? समोरच्या व्यक्तीच्या शंभर चुका असतील, तरीही आपण आपलीच चूक आहे असे समजून पुढे निघून जावे. या काळात 'लॉ' (कायदा) बघायचा असतो का? हे तर आता शेवटच्या पायरी वर पोहोचले आहे. जिथे बघाल तिथे धावपळ, पळापळ! लोक गुरफटून गेले आहेत. घरी गेलो तर बायकोची तक्रार, मुलांची तक्रार, नोकरीवर गेला की साहेब ओरडतात, रेल्वेत गेलो तर गर्दीत धक्के खावे लागतात. कुठेही शांतता नाही. शांतता तर पाहिजे ना? कोणी भांडले तर आपण त्याच्यावर दया करावी. अरेरे! त्याला किती ताण असेल म्हणून तो भांडायला उठला! जे चिडतात ते सर्व कमकुवतच असतात.

## तक्रार? नाही, 'एडजस्ट'

असे आहे की, घरात सुद्धा एडजस्ट होता आले पाहिजे. तुम्ही सत्संगातून उशीरा घरी गेलात, तर घरची माणसे काय म्हणतील? वेळसुद्धा जपली पाहिजे ना? मग आपण लवकर घरी जावे हे काय चुकीचे आहे? बैल सरळ चालत नसेल तर तेली त्याला आरी टोचतो, त्यापेक्षा तो जर पुढे चालत राहिला तर तेली त्याला आरी टोचणार नाही ना! आरी टोचल्यावर त्याला पुढे जावेच लागेल. चालायचे तर आहेच ना? तुम्ही पाहिले आहे का असे? खिळ्याची आरी असते, त्या आरीने टोचतात. मुका प्राणी काय करणार? तो कोणाकडे तक्रार करणार?

ह्या लोकांना जर आरी टोचली तर त्यांना वाचविण्यासाठी इतर लोक येतील. पण तो मुका प्राणी कोणाकडे तक्रार करणार? आता त्यांना असा मार खाण्याची पाळी का आली? कारण पूर्वी (मागच्या जन्मात) पुष्कळ तक्रारी केल्या होत्या. त्याचा हा परिणाम आला. त्यावेळी जेव्हा सत्तेवर आला, तेव्हा सारखी तक्रारच करीत होता. आता सत्ता नाही, म्हणून तक्रार केल्याशिवायच राहायचे. तर आता 'प्लस-माइनस' करून टाका. फिर्यादी झालो तर आरोपी होण्याची पाळी येणार ना? त्यापेक्षा

फिर्यादी होऊच नये, त्यात काय चुकीचे आहे? आणि आपल्याला तर आरोपी पण व्हायचे नाही, आणि फिर्यादी पण व्हायचे नाही. समोरच्याने शिव्या दिल्या तर त्या जमा करून टाकायच्या. फिर्यादी व्हायचेच नाही ना! तुम्हाला कसे वाटते? फिर्यादी होणे चांगले आहे का? नाही, त्यापेक्षा आपण आधीच 'एडजस्ट' झालो तर काय वाईट?

## चुकीचे बोलण्यावर उपाय

व्यवहारात एडजस्टमेंट करणे, याला ह्या काळात 'ज्ञान' म्हटले आहे. हो, एडजस्टमेंट करा, एडजस्टमेंट तुटत असेल तरी पण एडजस्ट करून घ्यावे. तुम्ही त्याला बरे-वाईट बोलला. आता बोलणे ही आपल्या हातची गोष्ट नाही. कधी कधी तुमच्याकडूनही असे बोलले जाते की नाही? बोलून तर गेलो, पण नंतर लगेच आपल्या लक्षात येतेच की आपली चूक झाली आहे. लक्षात आल्याशिवाय तर राहतच नाही, पण तेव्हा आपण 'एडजस्ट' करायला जातच नाही. असे घडले की लगेचच त्याच्याजवळ जाऊन सांगायचे की, 'भाऊ, माझ्याकडून तेव्हा खूप बरे-वाईट बोलले गेले, माझी चूक झाली, म्हणून मला माफ कर.' म्हणजे एडजस्टमेंट झाली. त्याला काही हरकत आहे का?

**प्रश्नकर्ता :** नाही, कसलीच हरकत नाही.

## सगळीकडे एडजस्टमेंट करायला हवी

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळआ अशी परिस्थिती निर्माण होत असते की, एकाच वेळी दोन व्यक्तींसोबत एकाच गोष्टीसाठी 'एडजस्टमेंट' करायची असते, तर अशा वेळी आम्ही दोघांशी कसे एडजस्ट होऊ शकतो?

**दादाश्री :** दोघांसोबतही एडजस्ट होता येते. अरे, सात माणसांसोबतही एडजस्टमेंट घ्यायची असेल तरी घेऊ शकतो. एकाने विचारले, 'माझ्या कामाचे काय केले?' तेव्हा सांगायचे, 'हो, भाऊ.

तुझ्या सांगण्याप्रमाणे करीन.' दुसऱ्यालाही असेच सांगायचे, 'तुम्ही सांगाल तसे करीन.' 'व्यवस्थित शक्ति'च्या बाहेर काहीही घडणार नाही. म्हणून कुठल्याही परिस्थितीत भांडण करू नका. मुख्य तर 'एडजस्टमेंट' करणे हेच आहे. 'हो' (होकार)ने मुक्ती आहे. आपण 'हो' म्हटले तरी पण 'व्यवस्थित'च्या बाहेर काही घडणार आहे का? परंतु 'नाही' म्हटले तर मात्र मोठी उपाधी!

घरात पति-पत्नी या दोघांनी निश्चय केला की मला 'एडजस्ट' व्हायचे आहे, तर दोघांचे समाधान होईल. त्याने जास्त खेचले, तर आपण 'एडजस्ट' होऊन जायचे, म्हणजे दोघांचे समाधान होईल. एका माणसाचा हात दुखत होता, परंतु त्याने कोणालाही सांगितले नाही आणि दुसऱ्या हाताने त्या हाताला दाबून 'एडजस्टमेंट' केली! अशा प्रकारे 'एडजस्ट' झालो तर तोडगा निघेल. तुम्ही जर असे 'एडजस्ट एवरीव्हेर' झाला नाहीत, तर वेडे व्हाल. समोरच्याला डिवचत राहता म्हणून तर वेडे झाले आहात. ह्या कुत्र्याला एकदा डिवचले, दुसऱ्यांदा, तिसऱ्यांदा डिवचले तोपर्यंत गप्प बसेल पण नंतर पुन्हा पुन्हा डिवचत राहिलो तर तो चावेल. तो देखील समजून जाईल की हा माणूस मला रोजच त्रास देत आहे, तो नालायक आहे, निर्लज्ज आहे. हे आपण समजून घेण्यासारखे आहे. कुठल्याही भानगडीत पडायचे नाही, 'एडजस्ट एवरीव्हेर.'

ज्याला 'एडजस्ट' व्हायची कला जमली तो जगातून मोक्षाकडे वळला. एडजस्टमेंट केली त्याला म्हणतात 'ज्ञान'. जो एडजस्टमेंट करायला शिकला त्याचा बेडा पार. जे भोगायचे आहे, ते भोगावेच लागणार आहे, परंतु ज्याला 'एडजस्टमेंट' करता आली, त्याला काही अडचण येणार नाही. हिशोब पूर्ण होऊन जाईल. समजा कधी लुटारू भेटले, तेव्हा त्यांच्याबरोबर 'डिसएडजस्ट' झालो तर ते आपल्याला मारतील. त्यापेक्षा आपण ठरवायचे की त्यांना 'एडजस्ट' होऊन काम करायचे आहे. नंतर त्याला विचारावे की, 'भाऊ, तुझी काय इच्छा आहे?

बघ भाऊ, आम्ही तर यात्रा करायला निघालो आहोत.' अशा प्रकारे त्याच्यांशी 'एडजस्ट' होऊन जावे.

पत्नीने जेवण बनविले असेल, त्यात चुका काढणे म्हणजे ब्लंडर्स.

अशा चुका काढायच्या नसतात. जसे काही तो स्वत: कधी चुकतच नाही, असे बोलतो. हाऊ एडजस्ट? एडजस्टमेंट करायला हवी. ज्याच्यासोबत कायम राहायचे आहे, त्याच्याशी 'एडजस्ट' व्हायला नको का? आपल्यामुळे कोणालाही दु:ख होते, त्याला महावीर भगवंतांचा धर्म कसे म्हणता येईल? आणि घरातील माणसांना तर नक्कीच दु:ख द्यायचे नाही.

## घर एक बगीचा

एक भाऊ मला म्हणतो की, 'दादा माझी बायको घरात अशी करते, तशी करते.' तेव्हा मी त्याला म्हणालो की तुझ्या बायकोला जर विचारले? तर ती काय म्हणेल 'माझ्या नवऱ्याला अक्कलच नाही.' आता ह्यात तुमच्या एकट्यासाठी न्याय का बरे शोधता? तेव्हा तो माणूस म्हणतो की, 'माझे तर घर बिघडले आहे, मुले बिघडली आहेत, बायको बिघडली आहे.' मी म्हणालो 'काहीच बिघडलेले नाही.' तुम्हाला नीट पाहता येत नाही. तुम्हाला तुमचे घर नीट पाहता आले पाहिजे प्रत्येकाची प्रकृती ओळखता आली पाहिजे.

घरात 'एडजस्टमेंट' करता येत नाही, त्याचे कारण काय? कुटुंबात जास्त सदस्य असतील, तर सगळ्यांशी जुळवून घेता येत नाही. त्यामुळे मग विनाकारण राईचा पर्वत होतो! तो कशासाठी? माणसांचा जो स्वभाव आहे, तो सगळ्यांचा एकसारखा नसतो. जसे युग असेल तसा स्वभाव बनतो. सत्‌युगात सर्वांशी सुमेळ असायचा. शंभर माणसे एका घरात असली तरी आजोबांनी सांगितल्याप्रमाणे सर्व जण वागत होते, आणि आताच्या या कलियुगात तर आजोबांनी काही सांगितले तर त्यांना शिव्या

द्यायला सुरुवात करतात, वडील काही म्हणाले, तर वडीलांनासुद्धा सुनवायला ते जरा सुद्धा कमी करत नाहीत.

आता मनुष्य हा मनुष्यच आहे. परंतु तुम्हाला ओळखता येत नाही. घरात पन्नास माणसे असतात परंतु आपल्याला सर्वांना ओळखता येत नाही, त्यामुळे भांडणे होतात. त्यांना ओळखायला तर हवे ना? घरात एक जण कटकट करीत असेल, तर तो त्याचा स्वभावच आहे. म्हणून आपण समजून जायचे की हा असाच वागणार. तुम्ही जर ओळखले की त्याचा स्वभाव असाच आहे मग आणखी काही तपास करण्याची गरज आहे का? एकदा आपण ओळखल्यानंतर पुन्हा तपास करायची गरजच नाही. कित्येकांना रात्री उशीरा झोपायची सवय असते आणि काही जणांना लवकर झोपायची सवय असते. तर त्या दोघांचा मेळ कसा बसेल? आणि एका कुटुंबात सर्व जण एकत्र राहत असतील तर काय होईल? घरात एक जण असे बोलणारा निघेल की 'तुम्हाला अक्कल कमी आहे,' तर आपण असे समजावे की हा असाच बोलणार. म्हणजे आपणच 'एडजस्ट' व्हावे. त्याऐवजी तुम्ही त्याला समोर काही उत्तर दिले तर तुम्ही थकून जाल. कारण तो तर आपल्यावर आपटत आहे (वाद, भांडण करत आहे) पण जर आपणही त्याच्यावर आपटलो तर आपल्यालासुद्धा डोळे नाहीत हे सिद्ध होईल ना? मी हे सांगू इच्छितो की प्रकृतीचे सायन्स ओळखा. बाकी आत्मा ही एक वेगळीच वस्तू आहे.

## विभिन्न, बागेतील फुलांचे रंग-सुगंध

तुमचे घर म्हणजे एक बगीचा आहे. सत्युग, द्वापार आणि त्रेतायुगात घरे म्हणजे शेताप्रमाणे होती. एखाद्या शेतात नुसते 'गुलाब', तर एखाद्या शेतात नुसता 'चंपा'. सध्या घर बागेसारखे झाले आहे. आपल्याला हा 'मोगरा' आहे किंवा 'गुलाब' आहे हे कळायला नको का? सत्युगात असे होते, एका घरात 'गुलाब' असेल तर सर्वच 'गुलाब' आणि दुसऱ्या घरात 'मोगरा' तर घरचे सर्वच मोगरे, असे होते. एका

कुटुंबात सगळी गुलाबाचीच रोपे, म्हणजे एका शेतासारखे, त्यामुळे काही समस्या नव्हती आणि सध्या तर बगीचे झाले आहेत. एका घरात एक गुलाबासारखा, एक मोगऱ्यासारखा, त्यामुळे तो गुलाब ओरडतो, की तू का माझ्या सारखा नाहीस? तुझा रंग बघ, कसा पांढरा, आणि माझा रंग किती छान आहे? त्यावर मोगरा म्हणेल तुला तर नुसते काटेच आहेत. आता गुलाब असेल तर काटे असणारच. मोगरा असेल तर काटे नसणार. मोगऱ्याचे फूल पांढरे असणार, गुलाबाचे फूल गुलाबी असणार, लाल असणार. सध्याच्या कलियुगात एकाच घरात वेगवेगळी रोपे असतात. अर्थात घर बगीच्यासारखे झाले आहे. पण हे असे ज्याला पाहताच येत नाही, मग काय होणार? मग तर दु:खच होणार ना! जगाकडे असे पाहण्याची दृष्टी नाही. खरे तर कोणीच वाईट नसतो. हे मतभेद तर स्वत:च्या अहंकारामुळे होत असतात. ज्याला पाहता येत नाही, त्याला अहंकार आहे! मला अहंकार नाही. त्यामुळे माझे संपूर्ण जगात कुणाशीही मतभेद होत नाहीत. मला पाहता येते, की हा गुलाब आहे, हा मोगरा आहे, हा धतूरा आहे, हे कडू तोंडल्याचे फूल आहे. असे सारे मी ओळखतो. म्हणजे हे बागेसारखे झाले आहे, तेव्हा एक प्रकारे हे सर्व कौतुकास्पदच आहे ना? तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे.

**दादाश्री :** असे आहे, की प्रकृतीत फरक पडत नाही. हा तर त्याचा तोच माल. त्यात फरक पडत नाही. आम्ही प्रत्येक प्रकृती समजून घेतली आहे, म्हणून लगेच ओळखतो. त्यामुळे प्रत्येकासोबत त्याच्या त्याच्या प्रकृतीनुसार वागतो. ह्या सूर्यासोबत आपण दुपारी बारा वाजता मैत्री केली तर काय होईल? त्याच प्रमाणे जर आपण असे समजून घेतले की हा उन्हाळ्यातील सूर्य आहे, हा हिवाळ्यातील सूर्य आहे, मग काही त्रास होईल का?

आम्ही प्रकृतीला ओळखतो, म्हणून तुम्ही आपटण्यासाठी

(वादविवादासाठी) याल तरी मी तुम्हाला आपटू देणार नाही, मी बाजूलाच होईल. नाही तर दोघांचा ॲक्सिडन्ट होईल आणि दोघांचे स्पेयरपार्टस तुटून जातील. एखाद्याचा गाडीचा बंपर तुटला तर आत बसलेल्यांची काय दशा होईल? आत बसलेल्यांची दुर्दशा होऊन जाईल ना! म्हणून प्रकृतीला ओळखा. घरातील सर्वांची प्रकृती ओळखून घ्यावी.

या कलियुगात, प्रकृती ही शेतासारखी नाही, बागेसारखी आहे. एक चाफा, दुसरा 'गुलाब', 'मोगरा', 'चमेली' असे सारे आहेत. म्हणून ती सर्व फुले भांडतात. त्यातील एक जण म्हणेल माझे असे आहे, तेव्हा दुसरा म्हणेल माझे असे आहे. मग एखादा म्हणेल तुला काटे आहेत, तुझ्याजवळ कोण उभे राहील? अशी भांडणे होतच राहतात.

## काउंटरपुलीची करामत

आपण सुरुवातीला आपले मत मांडू नये. समोरच्याला विचारावे की ह्या बाबतीत तुझे काय मत आहे? समोरच्या व्यक्तीने स्वत:चेच मत धरुन ठेवले तर आम्ही आमचे मत सोडून देतो. आपल्याला तर एवढेच पाहायचे आहे की कोणत्याही कारणाने, समोरच्याला दु:ख व्हायला नको. आपला अभिप्राय समोरच्या व्यक्तीवर लादायचा नाही. समोरच्या व्यक्तीचा अभिप्राय आपण स्वीकारावा. आम्ही तर सर्वांचा अभिप्राय घेऊनच ज्ञानी झालो आहोत. मी माझा अभिप्राय कोणावर लादला तर त्यात मीच कच्चा ठरेन. आपल्या अभिप्रायामुळे कोणालाही दु:ख होता कामा नये.

तुझी रिवोल्यूशन्स अठराशे असतील आणि समोरच्या व्यक्तीची सहाशे असतील आणि तू त्याच्यावर तुझा अभिप्राय लादलास, तर त्याचे इंजिन तुटून जाईल. त्याचे सर्व गियर बदलावे लागतील.

**प्रश्नकर्ता :** रिवोल्यूशन्स म्हणजे काय?

**दादाश्री :** म्हणजे विचारांची 'स्पीड' (गती), जी प्रत्येकाची

वेगवेगळी असते. काही तरी घडले की मन एका मिनिटात किती तरी दाखवून देते, त्याचे सर्व पर्याय 'एट ए टाईम' (एकाचवेळी) दाखवून देते. मोठमोठ्या प्रेसिडेन्टची मिनिटाला बाराशे रिवोल्यूशन्स फिरत असतील, तर आमची पाच हजार आहेत. महावीर भगवंतांची लाख 'रिवोल्यूशन्स' फिरत होती.

हे मतभेद होण्याचे कारण काय? समजा तुमच्या बायकोची शंभर रिवोल्यूशन्स असतील आणि तुमची पाचशे रिवोल्यूशन्स असतील आणि तुम्हाला जर यामध्ये काउंटरपुली ठेवता आली नाही, तर ठिणगी उडेल, आणि भांडणे होतील. अरे कित्येक वेळा तर इंजिन सुद्धा मोडेल. रिवोल्यूशन्स म्हणजे काय हे समजले का तुम्हाला? तुम्ही जर एखाद्या मजुराला काही सांगितले तर त्याला समजणार नाही. कारण त्याची रिवोल्यूशन्स पन्नास आहेत आणि तुमची पाचशे असतील, कोणाची हजार असतील, कोणाची बाराशे, ज्याची जशी डेव्हलपमेंट असेल, त्याप्रमाणे रिवोल्यूशन्स असतात. त्यामध्ये जर काउंटरपुली ठेवता आली तरच त्याला तुमची गोष्ट समजू शकेल. काउंटरपुली म्हणजे तुम्हाला मधे पट्टा टाकून तुमचे रिवोल्यूशन्स कमी करावे लागतील. मी प्रत्येक माणसासोबत काउंटरपुली टाकून देतो. फक्त अहंकार काढल्यानेच काम होईल, असे नाही. काउंटरपुली सुद्धा प्रत्येकाच्या रिवोल्यूशन्सनुसार टाकावी लागते. म्हणूनच माझे कोणाशीही मतभेद होत नाही. मी जाणतो की ह्या माणसाचे एवढेच 'रिवोल्यूशन्स' आहेत. म्हणून मी त्याप्रमाणे काउंटरपुली टाकतो. माझे तर लहान मुलांसोबतही चांगले जमते. कारण मी त्यांच्यासोबत चाळीस रिवोल्यूशन्स ठेवून वागतो. त्यामुळे माझे म्हणणे त्यांच्यापर्यंत पोहोचते. नाही तर ती 'मशीन' मोडून जाईल.

**प्रश्नकर्ता :** कोणीही जर समोरच्या व्यक्तीच्या लेव्हलपर्यंत आला तरच संवाद साधता येईल?

**दादाश्री :** हो त्याच्या 'रिवोल्यूशन्स'पर्यंत आला तरच संवाद

साधला जाऊ शकतो. तुमच्यासोबत बोलताना आमची रिवोल्यूशन्स कुठल्या कुठे जाऊन येतात. संपूर्ण जगात फिरून येतात. तुम्हाला 'काउंटरपुली' टाकता आली नाही, तर त्यात कमी रिवोल्यूशन्स असलेल्या इंजिनाचा काय दोष? तो तर तुमचाच दोष की तुम्हाला काउंटरपुली टाकता आली नाही!

## शिका फ्यूज लावायला

एवढेच ओळखायचे आहे की ही 'मशीनरी' कशी आहे, आणि जर त्याचा 'फ्यूज' उडाला, तर तो कसा लावायचा. समोरच्या व्यक्तीच्या प्रकृतीशी जुळवून घेता आले पाहिजे. आमची तर, समोरच्याचा 'फ्यूज' उडाला, तरीही आमची एडजस्टमेंट होते. परंतु समोरच्याची एडजस्टमेंट बिघडली तर काय होईल? फ्यूज उडाला की मग तो भिंतीशी किंवा दाराशी आपटतो पण वायर तुटत नाही, कनेक्शन तुटत नाही. म्हणून जर कोणी फ्यूज लावून दिला तर पुन्हा सर्व काही नीट होईल. नाही तर तोपर्यंत तो गोंधळत राहील.

## आयुष्य कमी आणि गोंधळ जास्त

सर्वात मोठे दु:ख कसले आहे? 'डिसएडजस्टमेंटचे,' त्या ऐवजी तेथे 'एडजस्ट एवरीव्हेर' झालो तर काय हरकत आहे?

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी तर पुरुषार्थ हवा.

**दादाश्री :** कसलाही पुरुषार्थ नाही. दादांनी सांगितले आहे, 'एडजस्ट एवरीव्हेर' एवढे पालन करायचे, तर एडजस्ट होता येते. बायको म्हणाली की, 'तुम्ही चोर आहात' तर तिला म्हणायचे, 'यू आर करेक्ट' (तुझे खरे आहे). बायकोने दीडशे रुपयाची साडी आणायला सांगितली तर आपण पंचवीस रुपये जास्त द्यायचे. मग सहा महिने तरी ठीक चालेल!

असे आहे की, ब्रह्माचा एक दिवस, म्हणजे आपले संपूर्ण आयुष्य!

ब्रह्माच्या एका दिवसाइतकेच आपले जीवन आणि त्यासाठी एवढी धांदल? जर आपल्याला ब्रह्माची शंभर वर्षे जगायची असती तर आपण समजू शकतो की हो, बरोबर आहे, आपण का एडजस्ट व्हावे? 'दावा मांड' असे म्हणूया पण हा तर फक्त एकच दिवस आहे. आणि आपल्याला लवकर उरकायचे आहे. कार्य लवकर उरकायचे असेल, तर काय करायला हवे? 'एडजस्ट' होऊन थोडक्यात उरकून घ्यायला हवे, नाही तर लांबतच जाईल, नाही का? पत्नीसोबत भांडल्यानंतर रात्री झोप येईल का? आणि सकाळी नाश्ता पण चांगला मिळणार नाही.

## ज्ञानीची ज्ञानकला वापरा

एखाद्या दिवशी बायको म्हणाली, 'मला ती साडी नाही का घेऊन देणार?' मला ती साडी घेऊनच द्या. तेव्हा पती विचारतो 'केवढ्याची होती ती साडी?' तेव्हा ती सांगते, 'बावीसशे रुपायांची आहे, फार महाग नाही. 'तेव्हा तो म्हणतो, 'तू म्हणतेस बावीसशेची पण आता मी पैसे आणू कुठून? सध्या पैशाची सोय करता येणार नाही. दोनशे-तीनशेची असेल तर घेऊन देतो, पण तू तर बावीसशेची म्हणतेस.' ती मग रुसून बसली. आता काय स्थिती होणार? मनात असाही विचार यायला लागेल की अरे, त्यापेक्षा लग्नच केले नसते तर बरे झाले असते! लग्न केल्यानंतर प्रश्चाताप झाला तर तो काय कामाचा! म्हणजे ही अशी दुःखे आहेत.

**प्रश्नकर्ता :** तुम्हाला असे म्हणायचे आहे की बायकोला बावीसशे रुपयांची साडी घेऊन द्यायला हवी होती?

**दादाश्री :** साडी घेऊन द्यायची की नाही, हे तुमच्यावर अवलंबून आहे. रुसल्यावर ती रोज रात्री 'स्वयंपाक करणार नाही' असे म्हणेल, तेव्हा तुम्ही काय कराल? आचारी कोठून घेऊन याल? मग कर्ज करूनही तिला साडी विकत घ्यावी लागेल ना?

तुम्ही असे काही तरी करा की ती स्वतःच साडी आणणार नाही.

समजा आपल्याला महिन्याला आठ हजार रुपये मिळत असतील, त्यातून हजार रुपये आपल्या स्वतःच्या खर्चासाठी ठेवून, बाकीचे सात हजार तिला द्यायचे. मग ती आपल्याला सांगेल का, 'की साडी घेऊन द्या.' आणि एखाद्या दिवशी आपणच तिची थट्टा करायची, 'ती साडी तर खूप छान होती, तू का घेत नाहीस?' त्याचा प्रबंध आता तिलाच करावा लागेल! हा प्रबंध जर आपल्याला करायचा असता, तर तिने आपल्यावर दादागिरी केली असती. ही सर्व कला मी ज्ञान होण्यापूर्वीच शिकलो होतो. नंतर 'ज्ञानी' झालो. सर्व कला माझ्याजवळ आल्या, तेव्हाच मला 'ज्ञान' झाले! तर बोला, ही कला नाही, म्हणूनच हे दुःख आहे ना! तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** हो बरोबर आहे.

**दादाश्री :** तुमच्या लक्षात आले ना? यात चूक तर आपलीच आहे ना! आपल्यात कला नाही म्हणूनच ना? कला शिकण्याची गरजआहे.

## क्लेशाचे मूळ कारणः अज्ञानता

**प्रश्नकर्ता :** क्लेश होण्याचे कारण काय? स्वभाव जुळत नाही, म्हणून?

**दादाश्री :** अज्ञानता आहे म्हणून. कोणाचा स्वभाव कोणाशी जुळतच नाही, यालाच म्हणतात संसार. हे ज्ञान प्राप्त होणे, हा एकच त्यावर उपाय आहे, 'एडजस्ट एवरीव्हेर'! कोणी तुम्हाला मारले तरीही तुम्ही 'एडजस्ट' होऊन जावे.

आम्ही हा अगदी सरळ आणि सोपा मार्ग दाखवला आहे. आणि ही भांडणे काय रोजच्या रोज थोडीच होत असतात? ते तर जेव्हा आपल्या कर्माचा उदय होतो, तेव्हा होतात. तेवढ्या पुरते आपण 'एडजस्ट' व्हायचे. घरात पत्नीसोबत भांडण झाले तर, भांडण झाल्यानंतर बायकोला हॉटेलात घेऊन जायचे आणि छान जेवू घालून तिला खुश करायचे. आता तंत राहायला नको.

## दादाजी, पूर्णतः एडजस्टेबल

एकदा कढी छान झाली होती परंतु मीठ जरा जास्त झाले होते. तेव्हा मला वाटले की मीठ जरा जास्त झाले आहे पण थोडीशी खावीच लागणार ना! मग जेव्हा हीराबा (दादाजींची पत्नी) आत गेल्या, तेव्हा मी लगेच कढीत थोडे पाणी ओतले. ते त्यांनी पाहिले. त्या म्हणाल्या 'हे काय केले?' मी म्हणालो 'तुम्ही कढी स्टोव्हवर ठेवून मग पाणी टाकता, मी इथे वाटीत थोडे पाणी ओतले', तेव्हा त्या म्हणाल्या, पाणी ओतल्यावर आम्ही त्याला उकळी येऊ देतो. मी म्हणालो 'माझ्यासाठी सगळे उकळलेलेच आहे' मला तर कामाशी काम आहे ना?

तुम्ही मला अकरा वाजता सांगितले की, 'तुम्ही जेवून घ्या.' मी विचारीन, 'थोड्या वेळेनंतर जेवलो तर चालणार नाही का?' तुम्ही सांगाल, 'नाही, जेवून घ्या. म्हणजे सर्व आटोपता येईल'. मग लगेचच मी जेवायला बसून जाईन, मी तुम्हाला एडजस्ट होईन.

जे ताटात वाढले असेल ते खावे. जे समोर आले, ते संयोग आहे आणि भगवंतांनी सांगितले आहे, जर संयोगाला धक्का मारशील तर तो धक्का तुलाच लागेल! म्हणून आम्हाला न आवडीच्या वस्तू ताटात वाढलेल्या असतील तरीही आम्ही त्यातल्या दोन वस्तू खातो. नाही खाल्ले तर दोघांबरोबर भांडण होईल. एक तर ज्याने बनविले असेल त्याचा अनादर होईल, तिरस्कार होईल, आणि दुसरे खायच्या वस्तूबरोबर. खायची वस्तू म्हणेल,'मी काय गुन्हा केला आहे? मी तुझ्याकडे आली आहे आणि तू माझा अपमान का करतोस? तुला योग्य वाटेल तेवढे घे. पण माझा अपमान करू नकोस.' मग आपण तिला मान द्यायला नको का? आम्हाला तर न आवडणारी वस्तू दिली, तरीही आम्ही तिचा मान ठेवतो. त्याचे कारण म्हणजे एक तर कुठलीही वस्तू अशीच मिळत नाही, आणि जर मिळाली तर तिला मान द्यायला हवा. ही खायची वस्तू तुम्हाला दिली आणि तुम्ही जर त्यात खोड काढली तर तुमचे सुख कमी होईल की वाढेल?

ज्यामुळे सुख कमी होईल असा व्यापार करायचाच नाही! मी तर पुष्कळ वेळा न आवडणारी भाजी पण खात असतो आणि वर म्हणतो, 'आजची भाजी तर खूप छान झाली आहे.'

अरे, कित्येकदा तर चहात साखर टाकायची राहून गेली तरी आम्ही काहीही बोलत नाही. तेव्हा लोक म्हणतात 'तुम्ही जर असेच वागाल तर घरात सर्व बिघडेल!' मी म्हणालो 'तुम्ही पाहा तरी, उद्या काय घडते ते?' त्यानंतर दुसऱ्या दिवशी त्यांनी मला विचारले 'काल चहात साखर नव्हती तर तुम्ही का काही बोलला नाहीत?' मी म्हटले, 'मला सांगायची काय गरज? तुमच्या लक्षात येईलच ना! तुम्ही चहा पीत नसाल तर मला सांगायची गरज पडेल. पण तुम्ही चहा पिता, मग मला सांगायची काय गरज?'

**प्रश्नकर्ता :** पण किती जागृती ठेवावी लागते, क्षणोक्षणी?

**दादाश्री :** क्षणोक्षणी, चोवीस तास जागृती. त्यानंतरच हे 'ज्ञान' सुरू झाले. हे 'ज्ञान' असेच सहजासहजी झालेले नाही. आधीपासूनच अशा प्रकारे सर्व 'एडजस्टमेंटस्' केल्या होत्या शक्यतो क्लेश होऊ दिले नव्हते.

एकदा आम्ही अंघोळीला गेलो, पण तेथे ते लोक तांब्या ठेवायलाच विसरुन गेले होते. पण एडजस्टमेंट केली नाही तर आम्ही ज्ञानी कसले? हात पाण्यात टाकला तर पाणी फार गरम. नळ उघडला तर टाकी रिकामी. मग आम्ही तर हळूहळू हाताने पाणी चोपडून चोपडून, थंड करून केली. सर्व महात्मा म्हणाले 'आज दादाजींना आंघोळीला खूप वेळ लागला?' पण काय करणार? पाणी थंड होईल तेव्हा ना? आम्ही कधी कोणाला 'हे आणा, ते आणा' असे सांगत नाही. 'एडजस्ट' होऊन जातो. 'एडजस्ट' होणे हाच धर्म आहे. या जगात प्लस-माईनसची एडजस्टमेंट करावी लागते. माईनस असेल तेथे प्लस आणि प्लस असेल तेथे माईनस करावे

लागते. आम्ही तर, आमच्या शहाणपणालासुद्धा कोणी वेडेपणा म्हटले, तर आम्ही म्हणतो 'हो बरोबर आहे.' लगेचच माईनस करून टाकतो.

ज्याला 'एडजस्ट' होता येत नाही, अशा माणसाला माणूस कसे म्हणायचे? जो संयोगाला वश होऊन एडजस्ट होतो, त्या घरात कधीच कटकट होणार नाही. आम्ही पण हीराबांशी एडजस्ट होत आलो होतो ना! त्यांचा लाभ घ्यायचा असेल तर 'एडजस्ट' व्हा. इथे तर लाभ तर कुठल्याही नाही आणि वैर बांधले जाईल ते वेगळे! कारण प्रत्येक जीव स्वतंत्र आहे, आणि तो सुख शोधायला आला आहे. इतरांना सुख द्यायला तो आलेला नाही. आता, जर त्याला सुखाच्या ऐवजी दु:ख मिळाले तर तो वैर बांधतो, मग पत्नी असो की मुलगा असो.

**प्रश्नकर्ता :** सुख शोधायला आला आपण दु:ख मिळाले त्यामुळे वैर बांधतो?

**दादाश्री :** हो, मग तो भाऊ असो की वडील असो पण आतल्या आत त्या गोष्टीसाठी वैर ठेवतो. हे जग सारे असेच आहे, वैरच बांधतात! स्वधर्मात कोणाशीही वैर नसते.

प्रत्येक व्यक्तीच्या जीवनात काही प्रिन्सिपलस् (सिद्धांत) असायलाच हवीत. पण तरी संयोगानुसार वागायला हवे. संयोगानुसार एडजस्ट होतो तो माणूस. जर प्रत्येक परिस्थितीत एडजस्टमेंट करायला जमली तर थेट मोक्षापर्यंत पोहोचता येते, असे फार आश्चर्यकारक हत्यार आहे हे!

हे दादाजी पण सूक्ष्म आहेत, काटकसरी आहेत आणि उदार सुद्धा आहेत. पूर्णपणे उदार आहेत, तरीही पूर्ण एडजस्टेबल आहेत. परक्यांसाठी उदार, स्वत:साठी काटकसरी आणि उपदेश करण्यास सूक्ष्म. त्यामुळे समोरच्या व्यक्तीला आमचा व्यवहार सुझबुझवाला (सूक्ष्म समजूतीचा) दिसतो. आमची इकोनॉमी एडजस्टेबल असते, उत्कृष्ट असते. आम्ही तर पाणी पण काटकसरीने वापरतो. आमचे प्राकृत गुण सहज भावात असतात.

## नाही तर व्यवहाराचा गुंता अडवणार?

प्रथम हा व्यवहार शिकायचा आहे, व्यवहाराची समज नसल्यामुळेच तर लोक सगळीकडून मार खात असतात.

**प्रश्नकर्ता :** अध्यात्मासंबंधी आपले ज्ञान सर्वोत्कृष्ट दर्जाचे आहेच, परंतु व्यवहारातसुद्धा आपली गोष्ट टॉप आहे.

**दादाश्री :** असे आहे की व्यवहार टॉप (उत्कृष्टपणे) समजल्याशिवाय कुणीही मोक्षाला गेलेला नाही. लाख मोलाचे आत्मज्ञान असेल पण व्यवहार सोडणार का?! व्यवहाराने तुम्हाला सोडले नाही, तर तुम्ही काय करणार? तुम्ही शुद्धात्मा आहातच पण व्यवहाराने सोडले तर ना? तुम्ही व्यवहाराचा गुंता वाढवतच राहता. अरे, झपाट्याने सुटका करा ना!

ह्या भाऊला सांगितले की, 'जा, दुकानातून आईस्क्रीम घेऊन ये' पण तो अर्ध्या वाटे वरून परत आला, आपण विचारले, 'का परत आलास?' तर तो म्हणेल 'रस्त्यात गाढव दिसले, अपशकुन झाला!!' आता त्याला असे चुकीचे ज्ञान झाले आहे, ते आपण काढायला हवे ना? त्याला समजावायला हवे की, 'भाऊ, गाढवामध्ये सुद्धा भगवंत विराजमान आहेत. यात अपशुकनसारखे काही नसते. तू गाढवाचा तिरस्कार करशील तर ते त्याच्यात विराजमान भगवंताला पोहोचेल. त्यामुळे तुला भयंकर दोष लागेल, पुन्हा असे करू नकोस.' असे चुकीचे ज्ञान झाले आहे, त्यामुळे तर लोक एडजस्ट होऊ शकत नाहीत.

## जो उलट्याला सुलटे करतो, तोच समकिती

समकितीची निशाणी काय? तर समजा घरातील सर्वांनीच काही उलटे केले, तरीही तो त्याला सुलट करून टाकतो. प्रत्येक बाबतीत सुलटच करणे ही समकितीची निशाणी आहे. आम्ही ह्या संसाराचा फार सूक्ष्म शोध घेतला आहे. सर्वात अंतिम प्रकारचा शोध घेतल्यानंतरच

आम्ही ह्या सर्व गोष्टी करीत आहोत. व्यवहारात कशा प्रकारे राहावे, तेही सांगतो आणि मोक्षाला कसे जाता येईल, हेही सांगतो. तुमच्या अडचणी कशा प्रकारे कमी होतील, हा आमचा हेतू आहे.

आपली गोष्ट समोरच्याला 'एडजस्ट' व्हायलाच हवी. आपली गोष्ट समोरच्याला 'एडजस्ट' झाली नाही तर ती आपलीच चूक आहे. चूक सुधारली तर 'एडजस्ट' होता येईल. वीतरागांची गोष्ट 'एवरीव्हेर एडजस्टमेंट'ची आहे.

**प्रश्नकर्ता :** दादा 'एडजस्ट एवरीव्हेर.' हे जे तुम्ही सांगितले त्यामुळे तर भल्याभल्यांना निकाल करता येईल असे आहे.

**दादाश्री :** सर्वांचाच निकाल लागेल. आमचे जे एक-एक शब्द आहेत ते सर्व लवकरात लवकर निकाल आणणारे, थेट मोक्षापर्यंत घेऊन जाणारे आहेत. म्हणून 'एडजस्ट एवरीव्हेर'.

**प्रश्नकर्ता :** आतापर्यंत जिथे पटत होते तिथेच सर्व जण 'एडजस्ट' होत होते. पण तुमच्या बोलण्यात तर असे आले की, जिथे पटत नसेल, तिथे तर हमखास एडजस्ट होऊन जायचे.

**दादाश्री :** हो, 'एवरीव्हेर एडजस्ट' व्हायचे आहे.

## दादांचे अजब विज्ञान!!!

**प्रश्नकर्ता :** 'एडजस्टमेंट'ची जी गोष्ट आहे. त्यामागील भाव काय आहे? मग कुठपर्यंत एडजस्टमेंट घ्यायची?

**दादाश्री :** भाव शांतीचा आहे. हेतू शांतीचा आहे, अशांती उत्पन्न होऊ न देण्याची ही किमया आहे. दादांचे 'एडजस्टमेंट'चे विज्ञान आहे. फार अजब 'एडजस्टमेंट' आहे आणि जेथे एडजस्ट होऊ शकत नाही, तेथे त्याचा स्वाद तर तुम्हाला येतच असेल ना? 'डिसएडजस्टमेंट' हाच मूर्खपणा आहे. 'एडजस्टमेंट'ला आम्ही न्याय म्हणतो. आग्रह-दुराग्रह,

याला काही न्याय म्हणता येणार नाही. कोणत्याही प्रकारचा आग्रह, हा न्याय नाही. आम्ही कोणत्याही बाबतीत अडून बसत नाही. ज्या पाण्याने मूग शिजतील, त्या पाण्याने शिजवतो. शेवटी गटाराच्या पाण्याने का होईना, पण शिजवतो!!

आतापर्यंत एकही माणूस, आमच्याशी 'डिसएडजस्ट' झालेला नाही. आणि लोकांना तर स्वतःच्या घरातील चार माणसेसुद्धा 'एडजस्ट' होत नाहीत. तुम्हाला एडजस्ट होणे जमेल? की नाही? असे होऊ शकेल की नाही? (दादांना) पाहिल्यानंतर तुम्हाला सुद्धा जमेलच ना! या जगाचा नियमच असा आहे की जेवढे तुम्ही पाहता तेवढे तर तुम्हाला जमूनच जाते. त्यात मग काही शिकण्यासारखे राहिले नाही. कोणती गोष्ट जमणार नाही? मी जर तुम्हाला केवळ उपदेश देत राहिलो, तर ते तुम्हाला जमणार नाही, पण माझे आचरण बघून तुम्हालाही सहजपणे जमेल.

घरच्या लोकांशी 'एडजस्ट' होता येत नाही, आणि आत्मज्ञानाचे शास्त्र वाचायला बसला आहात! अरे! ते सोडा आता! आधी 'हे' शिका ना! घरात 'एडजस्ट' व्हायचे, हे तर जमत नाही. असे आहे हे जग!

संसारात दुसरे काहीही जमले नाही, तरी काही हरकत नाही. व्यापार कमी करता आला तरी चालेल, पण 'एडजस्ट' व्हायला मात्र यायला हवे. म्हणजे वास्तवात 'एडजस्ट' व्हायला शिकले पाहिजे. या काळात 'एडजस्ट' होता आले नाही तर मरून जाल. म्हणून 'एडजस्ट एवरीव्हेर' होऊन (मोक्षाचे) काम साधून घेण्यासारखे आहे.

**- जय सच्चिदानंद**

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं)
9. भावना सुधारे जन्मोजन्म
10. कर्माचे विज्ञान
11. पाप-पुण्य
12. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
13. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
14. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
15. मानव धर्म
16. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
17. सेवा-परोपकार
18. दान
19. त्रिमंत्र
20. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
21. चमत्कार
22. सत्य-असत्याचे रहस्य
23. वाणी, व्यवहारात (सं)
24. पैशांचा व्यवहार (सं)
25. क्लेश रहित जीवन
26. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
27. प्रेम
28. गुरू-शिष्य
29. अहिंसा
30. आप्तवाणी-1, 2, 3

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

**★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

# संपर्क सूत्र

## दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन :** 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | 9810098564 | **बेंगलूर** | 9590979099 |
| **कोलकता** | 9830080820 | **हैदराबाद** | 9885058771 |
| **चेन्नई** | 7200740000 | **पूणे** | 7218473468 |
| **जयपुर** | 8890357990 | **जलंधर** | 9814063043 |
| **भोपाल** | 6354602399 | **चंडीगढ** | 9780732237 |
| **इन्दौर** | 6354602400 | **कानपुर** | 9452525981 |
| **रायपुर** | 9329644433 | **सांगली** | 9423870798 |
| **पटना** | 7352723132 | **भुवनेश्वर** | 8763073111 |
| **अमरावती** | 9422915064 | **वाराणसी** | 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229

**www.dadabhagwan.org**



# एडजस्ट एवरीव्हेर

संसारात दुसरे काहीही जमले नाही तरी हरकत नाही, पण एडजस्ट मात्र होता आलेच पाहिजे. समोरचा जरी डिसएडजस्ट होत असेल पण आपल्याला एडजस्ट होता आले तर आपल्याला दुःख होणारच नाही. म्हणून 'एडजस्ट एव्हरीव्हेर.' सगळ्यांशी एडजस्ट होता येणे हाच सर्वात मोठा धर्म आहे. ह्या काळात तर सगळ्यांच्या प्रकृत्या वेगवेगळ्या असतात, मग एडजस्ट झाल्याशिवाय कसे चालणार?

आम्ही ह्या संसाराचा सूक्ष्म शोध घेतला होता. अंतिम प्रकारचा शोध घेतल्यानंतरच आम्ही हे सर्व सांगत आहोत. व्यवहारात कसे वागावे हे पण आम्ही सांगतो आणि मोक्षाला कसे जावे हे पण सांगतो. तुमच्या अडचणी कशा कमी होतील ते समजावणे हाच आमचा उद्देश आहे.

- दादाश्री



dadabhagwan.org




Printed in India

Price ₹10